महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि -३५/०८१४/प्र.क्र.४४३/ख

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :१७/०१/२०२०.

विषय : गौण खनिज-सातारा

सन २०११-१२ या वर्षाकरिता मौजे बेलवडे-हवेली, ता. कराड या वाळूगटातून मंजूर वाळूचे उत्खनन न करता आल्याने शासनजमा केलेली लिलावाची रक्कम परत करणेबाबत.
-मयुरेश्वर डेव्हलपर्स तर्फे श्रीमती संगिता अरूण देशमुख

शासन ज्ञापन:

जिल्हाधिकारी, सातारा यांना त्यांचे पत्र क्र. गौख/कावि/११४३/१४ दि. ३०.८.२०१४, क्र. गौख-२०१६/कावि-१४९७/२०१६ दि. ३.९.२०१६, क्र. गौख/कावि/२३९४/२०१७ दि. ५.५.२०१७ च्या उपरोक्त विषयावरील पत्रांस अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०११-१२ या वर्षात मौजे बेलवडे-हवेली, ता. कराड या वाळूगटाचा लिलाव रु. ५५,००,०००/- इतक्या सर्वोच्च बोलीस मयुरेश्वर डेव्हलपर्स तर्फे श्रीमती संगिता अरूण देशमुख यांना मंजूर करण्यात आला. त्यानुसार लिलावधारकाने लिलावाची संपूर्ण रक्कम शासन जमा केला होती. त्यानुसार त्यांना दि. १५.१२.२०११ रोजी सदर वाळूगटाचा ताबा देण्यात आला.

२. तथापि, वाळू उत्खननामुळे शेतीपंपाचे आणि शेतीचे नुकसान होणे, जमीन खचत असल्याने मौजे बेलवडे हवेली येथील ग्रामपंचायत व ग्रामस्थ यांनी दि. ५.३.२०१२ रोजी ग्रामसभा घेऊन वाळू उत्खनन बंद करण्याबाबत ठराव मंजूर केल्यामुळे लिलावधारकास उत्खनन बंद करावे लागले. लिलावधारकाने तहसिलदार, कराड यांना दि. ९.३.२०१२ च्या पत्रान्वये सदर वाळूगटातून होत असलेल्या उत्खननामुळे पिण्याच्या पाण्यावर दुष्परिणाम होत असल्याने, ग्रावातील ग्रामस्थ व शेतकरी यांनी सदर वाळूगट बंद पाडला असल्याबाबत कळविले.

दरम्यान उत्खनन न करता आलेल्या वाळूसाठ्याची रक्कम परत मिळणेबाबत लिलावधारकाने तत्कालीन मा. राज्यमंत्री (महसूल) यांचेकडे अपील दाखल केले. मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दि. १२.९.२०१४ च्या आदेशान्वये अर्जदार यांना उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम परत मिळण्याबाबत विभागाने पुढील कार्यवाही करावे असे आदेश दिले.

त्याअनुषंगाने, मौजे बेलवडे-हवेली, ता. कराड या वाळूगटामूधन मंजूर वाळूचे उत्खनन करता न आल्याने शिल्लक वाळूच्या प्रमाणशीर परताव्याची रक्कम रु.३४,६७,१५१/- इतकी परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. सबब, लिलावधारक मयुरेश्वर डेव्हलपर्स तर्फे श्रीमती संगिता अरूण देशमुख यांना रु.३४,६७,१५१/- **(रुपये चौतीस लाख सदुसष्ट हजार एकशे एक्कावन्न फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याबाबीवर होणारा खर्च सन २०१९-२० यावर्षाकरीता लेखाशिर्ष, "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)" खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००११७१५३२५५००१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.01.17 15:33:43 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**अवर सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी सातारा, सातारा.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.

४) जिल्हा कोषागार अधिकारी सातारा, सातारा.

५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.

६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.

७) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.